बृहन्मुंबईमधील शासकीय इमारतीच्या आवारात जाहिरात फलक लावण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. शाकाजा-१११७/प्र.क्र.७९/२०१७/२२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १९ नोव्हेंबर, २०२०

**प्रस्तावना:**

शासन परिपत्रक, समक्रमांक दिनांक १५.१२.२०१८ या परिपत्रकान्वये रद्द करण्यात येत आहे. बृहन्मुंबईतील शासकीय इमारतींच्या आवारात जाहिरात फलक लावण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना या परिपत्रकाद्वारे निर्गमित करण्यात येत आहेत:-

**शासन परिपत्रक :**

१. बृहन्मुंबईतील शासकीय इमारतींच्या आवारातील मोकळया जागेत जाहिरात फलक लावण्यासाठी परवानगी देताना उपभोक्ता विभागाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन परिपत्रक क्र.जाहिनि २००५/ प्र.क्र.३२५/२०१५/रस्ते-६, दि.१३.०७.२०१६ मधील मार्गदर्शक सुचनानुसार निर्णय घ्यावा व निविदा कार्यवाही करुन भाडे वसूली करावी.

२. बृहन्मुंबईतील शासकीय इमारतींच्या आवारातील मोकळया जागेत जाहिरात फलक लावण्यासाठी परवानगी देताना जाहिरात फलक लावण्यापूर्वी फलकांमुळे शासकीय इमारतीस किंवा इमारती शेजारील रस्त्यावरील वाहतूकीस अडथळा होणार नाही याबाबत उपभोक्ता विभागाने शहानिशा करावी तसेच इमारतीमधील light,ventilation ला बाधा येणार नाही याची काळजी फलक बसविताना घेणे आवश्यक आहे.

३. बृहन्मुंबईतील शासकीय इमारतींच्या आवारात जाहिरात फलक लावण्यासाठी परवानगी देण्याकरीता शासकीय इमारतीच्या उपभोक्ता विभागाने जाहिरात फलक लावण्यासाठीच्या जागेची निश्चिती, तसेच विभागांमार्फत प्रस्तावित केलेल्या जागेमध्ये जाहिरातीचे फलक किती आकारमानाचे लावता येतील याची तपासणी करुन प्राप्त प्रस्तावातील जागेबाबत जाहिरात फलक लावण्याकरिता दर निश्चित करतांना त्या परिसरातील MCGM/MMRDA मार्फत लावण्यात आलेले जाहिरात फलकांचे सद्य:स्थितीत असलेले दर तसेच सद्याचा बाजारभाव व खाजगी जाहीरातींचे दर यांची तुलना करुन निविदा प्रक्रियेसाठी दर निश्चित करण्याची कार्यवाही करावी. निविदा प्रक्रियेमध्ये उच्चतम दर प्रस्तावित केलेल्या निविदा कारास जाहिरात फलक लावण्यास परवानगी देण्यात यावी. जाहिरात फलकाचे नियमित भाडे संबंधित संस्थेकडून वसूल करण्याची उपभोक्ता विभागाने दक्षता घ्यावी

४. बृहन्मुंबईतील शासकीय इमारतींच्या आवारात लावण्यात येणाऱ्या जाहिरात फलकासंदर्भात प्राप्त होणारा महसूल भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २६६ व २८४ नुसार राज्याच्या एकत्रित निधीमध्ये (Consolidated fund) जमा करण्यात यावा.

५. जाहिरात फलक लावण्यासाठी संबंधित संस्थेशी २ ते ३ वर्षाच्या कालावधीसाठी करारनामा करण्यात यावा.

६. बृहन्मुंबईमधील शासकीय इमारतींच्या आवारात जाहिरात फलक लावण्यासाठी आवश्यक असणारी सर्व ना-हरकत प्रमाणपत्रे जाहिरात फलक लावणाऱ्या संस्थेने (एजन्सी) संबंधित विभाग/बृहन्मुंबई महानगरपालिका/मुंबई पोलीस/सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडून प्राप्त करुन घ्यावीत. त्यानंतरच सदर संस्थेशी संबंधीत उपभोक्ता विभागाने करारनामा करण्याची कार्यवाही करावी.

७. वरील मार्गदर्शक सूचना बृहन्मुंबईमधील शासकीय इमारतींच्या आवारातील केवळ मोकळ्या जागेमध्ये जाहिरात फलक लावण्याकरीता देण्यात येत आहेत.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२०१११९१५२३३१३००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradnya Prakash Sawant

Digitally signed by Pradnya Prakash Sawant
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400065, st=Maharashtra, 2.5.4.20=dcab5c13648ccfdd9424ee4584da4e72f3f6f06dfd6b1eaa220fc9de68f36473, serialNumber=5a54b6f566784edd38767190d35e061b0d62cdb5d131b68c7c1d3d9c4fff0145, cn=Pradnya Prakash Sawant
Date: 2020.11.19 15:25:12 +05'30'

**( प्रज्ञा प्र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे सचिव.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
८. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सर्व मंत्रालयीन विभाग
१३. निवडनस्ती.